**अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम १९९५** नुसार अल्पसंख्याक विकास विभाग (खुद्द) च्या आस्थापनेवरील गट-ड मधील पदांवर शारीरिकदृष्टया अपंगांसाठी आरक्षण ठेवणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग,**
**शासन निर्णय क्र. अपंग २०११/प्र.क्र.२०१/का-१**
**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२**
**दिनांक : २२ नोव्हेंबर,२०११**

**वाचा:-** १. अपंग व्यक्ती (समान संधी संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम १९९५

२. शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र. एसआरव्ही १०९७/प्र.क्र.१२/१६अ, दि. २.५.१९९८

३. शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र. एसआरव्ही १०९७/प्र.क्र.३१/१६अ, दि. १६.३.१९९९

४. शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र. अपंग १००१/६१/प्र.क्र.३६/२००२/१६अ, दि. १०.५.२००२

५. शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र. न्यायाप्र-२००९/ प्र.क्र.५/ सुधार-३, दिनांक ३.८.२०१०

६. शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र. न्यायाप्र-२०११/ प्र.क्र.४/ सुधार-३, दिनांक १७.३.२०११

**प्रस्तावना :-**

अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम, १९९५ (जम्मू व काश्मीर राज्य वगळता) संपूर्ण देशामध्ये दिनांक ७.२.१९९६ पासून लागू करण्यात आला आहे व त्याप्रमाणे तो महाराष्ट्र राज्यातही त्या तारखेपासून लागू झाला आहे. सदर अधिनियमातील कलम ३२ नुसार अपंगांसाठी शासन सेवेत अपंग आरक्षण ठेवण्याची पदे शोधून काढणे /निश्चित (Identify) करणे आवश्यक आहे.

अपंग व्यक्तीसाठी सुधारित पद निश्चिती करण्यासंदर्भात मुंबई उच्च न्यायालयात दाखल करण्यात आलेल्या जनहित याचिका क्रमांक २२५/२००९ मध्ये मा. उच्च न्यायालयाने केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचनांनुसार शासकीय/निम शासकीय सेवेतील पदे अपंगांसाठी आरक्षित पदे सुनिश्चित करण्याचे निर्देश दिलेले आहेत. त्यास अनुसरुन सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने संदर्भ क्रमांक ५ व ६ अन्वये असे कळविले आहे की, केंद्र शासनाने अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम, १९९५ मधील तरतूदीस अनुसरुन त्यांच्या अखत्यारीतील आस्थापनेवरील अपंग व्यक्तींसाठी पदे निश्चित करुन यादी प्रसिद्ध केलेली आहे. केंद्र शासनाच्या या यादी नुसार राज्य शासनाच्या अखत्यारीतील शासकीय व निम शासकीय आस्थापनेवरील जी पदे समान आहेत ती पदे संबंधित विभागांनी अपंगांसाठी निश्चित करण्यासाठी आदेश निर्गमित करावेत. त्यानुसार अल्पसंख्याक

विकास विभाग (खुद्द) मधील सरळसेवेने भरण्यात येणाऱ्या गट-ड संवर्गातील पदांबाबत अपंगांसाठी आरक्षण निश्चित करण्याचा प्रस्ताव विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम, १९९५ मधील तरतूदीनुसार केंद्र शासनाने त्यांच्या अखत्यारीतील आस्थापनेवरील जी पदे अपंग व्यक्तीसाठी आरक्षण देण्यासाठी निश्चित केलेली आहेत त्या यादीशी तुलना करुन अल्पसंख्याक विकास विभाग (खुद्द) मधील गट ड या संवर्गातील सरळसेवा भरतीने भरावयाच्या पदांसाठी खालीलप्रमाणे अपंगांसाठी पदे निश्चित (Identify) करण्यात आहेत.

**अल्पसंख्याक विकास विभाग (खुद्द)**

| गट ड<br>शिपाई | क्षीण दृष्टी / अंध<br>(LV) / (B) | कर्णबधीर<br>( HH ) | अस्थिव्यंग<br>( OL) |
|---|---|---|---|

| | |
|---|---|
| LV- low vision | B- Blind |
| HH- Hearing Handicapped | OL- one leg affected |

अपंग व्यक्ती (समान संधी संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम, १९९५ चे कलम २ (टी) नुसार अपंग व्यक्तीचे अपंगत्व किमान ४० टक्के असणे आवश्यक राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा **सांकेतांक क्रमांक २०१११२३०९२४०७००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सही/-

( इ.मु.काझी )

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. मा. राज्यपालांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ३२
३. उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२
४. मा. मंत्री (अल्पसंख्याक विकास ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. राज्यमंत्री (अल्पसंख्याक विकास ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. अपर मुख्य सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, यांचे स्वीय सहाय्यक
७. प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
८. आयुक्त, अपंग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
९. उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग, (१६-अ), मंत्रालय, मुंबई
१०. सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई
११. सह सचिव / उप सचिव / सर्व अवर सचिव / सर्व कक्ष अधिकारी, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१२. निवडनस्ती (कार्यासन का-१)